**नॅशनल इंफॉरमेशन सेंटर (एन.आय.सी.) ची मंत्रालय मुख्य इमारत, २ रा मजला येथील जागा कौशल्य विकास व उद्योजकता विभागास वाटप करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाकाजा-१११५/प्र.क्र.१८६/२०१५/२२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २२ डिसेंबर,२०१६

**<u>प्रस्तावना :</u>**

कौशल्य विकास व उद्योजकतेस अधिक प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्यामध्ये स्वतंत्र कौशल्य विकास व उद्योजकता विभाग निर्माण करण्यात आला आहे. कौशल्य विकास व उद्योजकता विभागाकरीता मंत्रालय मुख्य इमारत, २ ऱ्या मजल्यावरील १८४० चौ.फू. इतकी जागा वाटप करण्यात आलेली जागा अपुरी पडत आहे. कौशल्य विकास व उद्योजकता विभागाकरीता सद्य:स्थितीत मंत्रालय मुख्य इमारतीमध्ये रिक्त जागा उपलब्ध नाही. मंत्रालय मुख्य इमारत, २ रा मजला येथील नॅशनल इंफॉरमेशन सेंटर (एन.आय.सी.) जागेतील अधिकारी व कर्मचारी यांना त्यांच्यासाठी आरक्षित असलेल्या १ ल्या व ३ ऱ्या मजल्यावरील जागेमध्ये स्थानान्तापन्न करुन मंत्रालय मुख्य इमारत, २ रा मजला येथील नॅशनल इंफॉरमेशन सेंटर (एन.आय.सी.) यांची ५०० चौ.फू. जागा कौशल्य विकास व उद्योजकता विभागास वाटप करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**शासन निर्णय:**

मंत्रालय मुख्य इमारत, २ रा मजला येथील नॅशनल इंफॉरमेशन सेंटर (एन.आय.सी.) जागेतील अधिकारी व कर्मचारी यांना त्यांच्यासाठी आरक्षित असलेल्या १ ल्या व ३ ऱ्या मजल्यावरील जागेमध्ये स्थानान्तापन्न करुन मंत्रालय मुख्य इमारत, २ रा मजला येथील नॅशनल इंफॉरमेशन सेंटर (एन.आय.सी.) यांची ५०० चौ.फू. जागा कौशल्य विकास व उद्योजकता विभागास वाटप करण्यात येत आहे.

कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, मुंबई यांनी उपरोक्त जागेचा ताबा संबंधितांना द्यावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२२१४३५०५२६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Harishchandra Bhagat

Digitally signed by Pramod Harishchandra Bhagat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400031, st=Maharashtra, cn=Pramod Harishchandra Bhagat
Date: 2016.12.22 14:38:42 +05'30'

**( प्र. ह. भगत )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व सन्माननीय विधानसभा/परिषद व संसद सदस्य
२. मा.सभापतींचे सचिव/मा.अध्यक्षांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिवांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५. सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
७. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
९. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. सह सचिव (का.२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. उप सचिव (आस्थापना), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय मुख्य इमारत, २ ऱ्या मजला, मुंबई-३२.
१२. राष्ट्रीय सूचना केंद्र (एन.आय.सी.), नवीन प्रशासन भवन, ११ वा मजला, पश्चिम बाजू, मुंबई-३२.
१३. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, बांधकाम भवन, २ रा मजला, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-०१.
१४. उप अभियंता, दक्षिण उपविभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, एम.टी.डी.सी.समोर, मुंबई.
१५. शाखा अभियंता (सा.बां.) बंगलो, नवीन प्रशासन भवन, तळमजला, मुंबई-३२.
१६. निवडनस्ती.